मौजे पाहुणी,ता.मोहाडी,जि.भंडारा या नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन निर्णय क्रमांकः क्र. सुप्रभा २११३/प्र.क्र.१४६/पापु १३**

**मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक**

**मुंबई-४०० ०३२**

**तारीखः २७ मार्च,२०१५**

**वाचा -**

१) शासन पत्र क्र.ग्रापापु-२०११/प्र.क्र.३६०/पापु-१३, दि.२४/०२/२०१२

२) मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद भंडारा यांचे पत्र क्र. ग्रा.पा.पु.वि/भंजिप/तांशा/३४०९/२०१४,दि.१०/११/२०१४

**प्रस्तावना -**

मौजे पाहुणी,ता.मोहाडी,जि.भंडारा या नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु.४०.३९ लक्ष (ढोबळ)** किमतीच्या अंदाजपत्रकास संदर्भीय क्र.**१** येथील पत्राद्वारे सहमती देण्यात आली होती. तथापी योजनेच्या खर्चात काही अपरिहार्य कारणामुळे वाढ झाली. त्यामुळे कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद भंडारा यांनी प्रस्तुत योजनेस दि.२४/०९/२०१४ रोजी सुधारीत तांत्रिक मान्यता दिली. यास्तव प्रस्तुत योजनेचा मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद भंडारा यांचेकडून संदर्भाधिन पत्र क्र. २ अन्वये प्राप्त झालेल्या **रु.४४.१७ लक्ष (ढोबळ)** किंमतीच्या मौजे पाहुणी,ता.मोहाडी, जि.भंडारा या नळ पाणी पुरवठा योजनेच्या आराखडयास व अदांजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय -

मौजे पाहुणी,ता.मोहाडी,जि.भंडारा या नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु.४४,१६,९५४/- (ढोबळ) (चव्वेचाळीस लक्ष सोळा हजार नऊशे चौपन्न फक्त) एवढ्या सुधारित किंमतीच्या अंदाजपत्रकास** पुढील अटींच्या अधिन राहून **सुधारीत प्रशासकीय मान्यता** देण्यात येत आहे.

**अटी**

१. उपरोक्त नमुद सुधारित किंमतीत योजनेची उर्वरित कामे ६ महिन्यात पूर्ण करण्यात यावीत. प्रस्तुत योजनेच्या खर्चात वाढ होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी. तसेच योजनेची कामे पूर्ण करुन योजनेचे लेखे बंद करण्यात यावेत.

२. या योजनेस सहमती दिलेल्या मूळ शासन पत्रात तसेच सुधारीत तांत्रिक मान्यता दिलेल्या नमुद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३. योजना पूर्ण झाल्यावर योजनेची यशस्वी चाचणी घेऊन योजना संबधित ग्रामपंचयातीला हंस्तातरीत करण्यात यावी. योजना स्वावलंबी ठरेल ही बघण्याची जबाबदारी जिल्हा परिषद भंडारा यांची राहील.

४. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.

५. योजना कोणत्याही परिस्थितीत पुर्नसुधारीत करण्यात येऊ नये.

६. या योजनेवरील सुधारित किंमतीतील **रु.३,७७,१५७/- (रु.तीन लक्ष सत्त्याहत्तर हजार एकशे सत्तावन्न फक्त)** एवढा वाढीव खर्च हा राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमा खालील राज्य हिश्श्यातून /जिल्हा नियोजन मंडळाकडून जिल्हा परिषदेस उपलब्ध होणा-या निधीतून करण्यात यावा.

**३.** सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या दि.१५/०५/२००९ रोजीच्या क्र. विअप्र-१०.०८/ प्र.क्र. ७०/ २००८/ विनियम या शासन निर्णयातील भाग पहिला, उपविभाग-३ मधील अ.क्र.६ (सहा) परिच्छेद क्र.२७(अ) अनुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे .

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२६१७३३२६६६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

CHANKAR SURENDRA PRALHAD

Digitally signed by CHANKAR SURENDRA PRALHAD
DN: CN = CHANKAR SURENDRA PRALHAD, C = IN, S = Maharashtra, O = WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, OU = WATER SUPPLY AND SANITATION,CID - 917820
Date: 2015.03.27 10:33:13 +05'30'

**( सु.प्र.चानकर)**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.
२) मा.विधानमंडळ सदस्य (सर्व)
३) जिल्हाधिकारी, भंडारा.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, भंडारा

५) अधीक्षक अभियंता,विभागीय भारत निर्माण कक्ष,विभाग नागपूर.
६) वरिष्ट भुवैज्ञानिक भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, भंडारा.
७) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
८) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई.
९) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण ना.व ग्रा.योजना विभाग,गोंदीया
१०) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, भंडारा.
११) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१२) मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१७) कार्यासन क्र.पापु-.४,६,७,९,१७, व १८ पा. पु. व स्व. वि.मंत्रालय,मुंबई-३२.
२०) निवडनस्ती कार्यासन पापु-१३.